**डागा स्मृती रुग्णालय, नागपूर येथील,**
**८५ अस्थाई पदे चालू ठेवण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
सार्वजनिक आरोग्य विभाग
शासन निर्णय क्रमांक- स्त्रिरुप-२३१०/५९/प्र.क्र. ३७/आरोग्य-३
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
**दिनांक : २ फेब्रुवारी, २०११.**

**वाचा :-** १) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्रमांक-पदआ-२००६/१२८/ प्र.क्र.१९/ आरोग्य-२, दिनांक ३० डिसेंबर, २००६.
२) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्रमांक-पदआ-२००७/प्र.क्र.११७/सेवा-१, दिनांक ६ ऑगस्ट, २००७.
३) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, समक्रमांक, दिनांक २०.१०.२०१०.

**शासन निर्णय :**

उपरोक्त अ.क्र. १ व २ च्या शासन निर्णयानुसार सुधारित आकृतीबंध मंजूर करण्यात आला असून, अ.क्र. ३ च्या शासन निर्णयानुसार डागा स्मृती रुग्णालय, नागपूर येथील ८५ अस्थाई पदे दिनांक ३१.१२.२०१० पर्यंत चालू ठेवण्यात आली होती. **सदर पदांचे स्थायीकरण करण्याची कार्यवाही शासनस्तरावर सुरु आहे. ही कार्यवाही अद्याप पूर्ण झाली नसल्याने विचाराधीन ८५ अस्थायी पदे या शासन निर्णयान्वये दिनांक १.१.२०११ ते दिनांक २८.२.२०११ पर्यन्त** चालू ठेवण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. यावरील खर्च खालील लेखाशिर्षाखाली खर्ची घालण्यात यावा आणि हा खर्च सन २०१०-२०११ या वर्षाकरिता मंजूर होणा-या अनुदानातून भागविण्यात यावा.

**मागणी क्रमांक -आर - १**
"२२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य
०१ - नागरी आरोग्य सेवा - विषम चिकित्सा
११० - रुग्णालये व दवाखाने
११०-२ - मुफसल क्षेत्रातील रुग्णालये व दवाखाने
(०१)(०१)- मुफसल क्षेत्रातील अध्यापनेतर शासकीय रुग्णालये ( २२१० ००१४६)"

३. हा निर्णय वित्त विभागाच्या क्र.असंक-१००४/प्र.क्र.१२/(भाग-२)/२००४/वित्तीय सुधारणा-१, दिनांक ४ ऑक्टोबर २००४ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा सांकेतांक क्रमांक- २०११०२०३१८३२२१००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्याआदेशानुसार व नावाने,

**( सुहास रा. चव्हाण )**
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन.**

प्रति

संचालक, आरोग्य सेवा,मुंबई.
सहसंचालक, आरोग्य सेवा (रुग्णालये-राज्यस्तर) मुंबई
सहसंचालक, आरोग्य सेवा (आरोग्य) पुणे / उपसंचालक, आरोग्य सेवा, नागपूर.
वैद्यकीय अधिक्षक, डागा स्मृति रुग्णालय, नागपूर
जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर.
महालेखापाल, १/२, महाराष्ट्र (लेखा व लेखा परिक्षा) (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
वित्त विभाग (व्यय-१३) (अर्थसंकल्प-१९) मंत्रालय, मुंबई
निवडनस्ती (आरोग्य-३)